सरळसेवा भरतीने कनिष्ठ अभियंता, गट-ब (अराजपत्रित) या पदावर नियुक्ती करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२ मे, २०१७.

**वाचा:-** १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१४/प्र.क्र. ५८८/ऊर्जा - ५, दि. २६/०२/२०१५.
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा - ५, दि. ८/७/२०१६.
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र. मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा - ५, दि. ८/७/२०१६.
४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. मुविनि-२०१६/प्र.क्र. ९४/ऊर्जा - ५, दि. १५/०२/२०१७.
५) मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांचे पत्र क्र. मुविनि/मु.लि./३७९/२०१७, दि. १४.०३.२०१७.

**शासन निर्णय:-**

विद्युत निरीक्षणालय शाखेअंतर्गत कनिष्ठ अभियंता गट-ब (अराजपत्रित) मधील पदे भरण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सन २०१४ मध्ये तत्कालीन मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्यामार्फत जाहिरातीव्दारे परिक्षा घेऊन दि. ११/०५/२०१६ रोजी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंतिम निवडसूची ऊर्जा विभागास प्राप्त झाली. त्यानुसार उपरोक्त संदर्भ क्र. २ व ३ अन्वये ४० उमेदवारांची ऊर्जा विभागांतर्गत विद्युत निरीक्षणालय शाखेमध्ये कनिष्ठ अभियंता या पदावर नियुक्ती करण्यात आली आहे. नियुक्ती देण्यात आलेल्या ४० उमेदवारांपैकी ६ उमेदवार विहीत कालावधी संपून गेल्यानंतरही नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्याने त्यांची नियुक्ती संदर्भ क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आली आहे. नियुक्ती रद्द केलेल्या ६ उमेदवारांऐवजी प्रतिक्षा यादीतील खालील ४ पात्र उमेदवारांची ऊर्जा विभागांतर्गत विद्युत निरीक्षणालय शाखेमध्ये त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयात कनिष्ठ अभियंता, गट-ब (अराजपत्रित) या पदावर वेतन बँड रु. ९,३००-३४,८००/- व ग्रे.पे. ४३००/- या वेतन संरचनेत, ते हजर होतील त्या दिनांकापासून एक वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी तात्पुरत्या स्वरूपात नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र | उमेदवाराचे नाव | जात प्रवर्ग | नियुक्ती देण्यात येत असलेले कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती. निकम वैशाली मोहनसिंग | वि.जा.अ. (महिला) | भंडारा |
| २ | श्रीमती मोहिते वृषाली विष्णू | खुला (महिला) | जालना |
| ३ | श्रीमती पाटील जयश्री प्रल्हाद | खुला (महिला) | अमरावती |
| ४ | श्रीमती सावंत हर्षाली गजानन | खुला (महिला) | नाशिक |

२. वरीलप्रमाणे करण्यात आलेली कनिष्ठ अभियंत्याची नियुक्ती ही, या विभागातील संबंधित कनिष्ठ अभियंता (विद्युत) या पदाच्या सेवाभरती नियमातील तरतुदीनुसार भरतीसाठी उपलब्ध असलेल्या रिक्त पदावर, एक वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण करण्याच्या व खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

३. उमेदवारांनी नियुक्ती स्विकारण्यासाठी उपस्थित राहताना सदर जाहीरातीत नमुद केल्यानुसार वयोमर्यादेची तसेच शैक्षणिक व अन्य अटींची पूर्तता करणारी मूळ प्रमाणपत्रे (वय, अधिवास, शैक्षणिक पात्रता, महिला आरक्षणासंदर्भात विहित केलेले व जात वैधता प्रमाणपत्र तपासणीसाठी सादर करावी.) सदर प्रमाणपत्रे अवैध ठरल्यास त्याची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

४. शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : बीसीसी-२०११/प्र.क्र.१०६४/२०११/१६-ब, दिनांक १२.१२.२०११ नुसार उपरोक्त यादीतील अनुक्रमांक उमेदवारांची त्यांच्या जात वैधता प्रमाणपत्र शिवाय सदर पदावर तात्पुरती नियुक्ती करण्यात येत आहे. नियुक्ती आदेश प्राप्त झाल्यानंतर सदर उमेदवारांनी नियुक्ती आदेशाच्या दिनांकापासून सहा महिन्याच्या आत आपल्या जात प्रमाणपत्राची वैधता संबंधित जात पडताळणी समितीकडून करुन घेणे आवश्यक राहील. त्याने नियुक्ती स्विकारताच जात वैधता तपासणी करण्यासाठी प्रस्ताव संबंधित जात पडताळणी समितीकडे सादर करावा व जात पडताळणी समितीने दिलेल्या पोच पावतीची साक्षांकित प्रत शासनास सादर करावी. सदर उमेदवारांनी जात वैधता प्रमाणपत्र सहा महिन्याच्या आत शासनास सादर केले नाही अथवा जात पडताळणी समितीने त्याचे जात प्रमाणपत्र अवैध ठरविले तर त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

५. उपरोक्त यादीत अभियंत्यांची आपआपसातील जेष्ठता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून या विभागास प्राप्त झालेल्या अंतिम निवड सूचीनुसार राहील.

६. उपरोक्त नमूद उमेदवारांना नियमानुसार आणि मराठी व हिंदी भाषा परीक्षा जर ती व्यक्ती आधीच या परीक्षा उत्तीर्ण झाली नसेल तर अथवा अशा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्याला/तिला सूट देण्यात आली नसेल तर या संबंधी केलेल्या नियमानुसार परीक्षा उत्तीर्ण व्हाव्या लागतील.

७. उपरोक्त नियुक्त केलेल्या उमेदवारांनी शासनाने वेळोवेळी विहित केलेली संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील. जी व्यक्ती सदर परीक्षा अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल तिला शासनाने विहित केलेली संगणक परीक्षा यासंबंधी असलेल्या नियमानुसार विहित कालावधीत उत्तीर्ण करावी लागेल.

८. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१.१०.२००५ मधील तरतुदीनुसार, दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर अधिकारी/कर्मचारी यांची शासन सेवेत नियुक्ती होताच त्यांना नवीन "परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना" लागू राहील. सध्या अस्तित्वात असलेली निवृत्तीवेतन योजना (म्हणजे महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतनाचे अंशराशीकरण) नियम १९८४) आणि सध्या अस्तित्वात असलेली सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू राहणार नाही. मात्र, उपरोक्त उमेदवारांपैकी जे शासकीय कर्मचारी दिनांक १ नोव्हेंबर, २००५ पूर्वी शासन सेवेत निवृत्तीवेतनार्ह आस्थापनेवर कार्यरत असतील त्यांना शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अनियो-१००६/८७/ सेवा-४, दिनांक १२ जानेवारी, २००७ मध्ये नमूद

केलेल्या अटींच्या पूर्ततेच्या अधीन राहून, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ व सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी योजना लागू ठरतील.

९. उपरोक्त नमूद नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांनी पदावर रुजू होण्यासाठी त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या कार्यालयाशी/ संबंधित अधीक्षक अभियंता (विद्युत) यांच्याशी तात्काळ संपर्क साधावा व नियुक्तीच्या पदावर तीस दिवसात उपस्थित व्हावे.

१०. संबंधित अधिक्षक अभियंता, विद्युत निरीक्षण मंडळ यांनी त्यांच्या मंडळांतर्गत नियुक्त झालेल्या उमेदवारांना तातडीने रुजू करुन घेऊन त्यांच्या सविस्तर पदस्थापनेचे आदेश त्वरीत निर्गमित करावेत. व त्या आदेशाच्या प्रतीसह रुजू अहवाल मुख्य विद्युत निरीक्षक यांना व शासनास सादर करावा.

११. नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांना विहित कालमर्यादेत हजर होणे शक्य नसल्यास तशी शासनाकडे आगावू परवानगी घेणे आवश्यक राहील. तशी परवानगी न घेतल्यास किंवा शासनाकडून त्यांना मुदतवाढ न मिळाल्यास त्यांना रुजू करुन घेतले जाणार नाही. तसेच अंतिम निवड सूचीनुसार त्यांना जेष्ठता मिळणार नाही. जे उमेदवार या शासन निर्णयाच्या तारखेपासून तीस दिवसांच्या आत हजर होणार नाहीत अथवा त्यांचेकडून यासंबंधात काही सूचना प्राप्त झाली नाही तर ही नियुक्ती त्यांना स्वीकृत नाही असे समजून त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल. याबाबतचा अहवाल संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी शासनाला एक महिन्याच्या आत सादर करावा. सदर पदावर नियुक्त करण्यात आलेली व्यक्ती, सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार, महाराष्ट्र राज्यात कोणत्याही ठिकाणी बदलीस पात्र असेल.

१२. सदर उमेदवारांपैकी जे उमेदवार सध्या शासन सेवेत कार्यरत आहेत त्यांच्या नियंत्रक अधिकाऱ्यांनी संबंधित उमेदवारांना नवीन ठिकाणी रुजू होण्यास तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच जे उमेदवार निमशासकीय सेवेत/महामंडळात कार्यरत आहेत त्यांनी त्यांच्या कार्यालयाचे ना हरकत प्रमाणपत्र तसेच त्यांच्या विरुध्द विभागीय चौकशी/ शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरु नसल्याबाबतचे प्रमाणपत्र नियुक्तीच्या वेळी सादर करावे.

१३. उपरोक्त उमेदवारांना नियुक्तीनंतर शासन सेवेचा राजीनामा द्यावयाचा असल्यास त्यांनी शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही १०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/आठ, दिनांक ०२.१२.१९९७ मधील तरतुदीनुसार शासनाला किमान एक महिन्याची पूर्वसूचना देणे आवश्यक राहील किंवा पूर्वसूचनेऐवजी त्यांचेकडून एक महिन्याचे वेतन वसूल करण्यात येईल. मात्र गैरशिस्त, सेवानियमांचा भंग इत्यादी कारणांसाठी एखाद्या उमेदवाराची सेवा समाप्त करण्यासाठी वरीलप्रमाणे नोटीस देण्याचे बंधन शासनावर राहणार नाही.

१४. उपरोक्त उमेदवार ज्या दिवशी रुजू होतील त्या दिवसापासून नियमाप्रमाणे त्यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यात येतील व त्यांची बदली झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांकडे पाठविण्यात यावेत.

१५. उपरोक्त उमेदवार एक वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीवर राहतील. हा परिविक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त एक वर्षापर्यंत वाढविता येईल. जर त्याने/तिने विहित अथवा वाढीव कालावधीत परिविक्षाधीन कालावधी यशस्वीरित्या पूर्ण केला नाही किंवा वरील परिच्छेद ५ व ६ मधील परीक्षा नियुक्तीच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या आत उत्तीर्ण केली नाही अथवा त्या पदावर काम करण्यास योग्य नसल्याचे आढळून आल्यास ती व्यक्ती सेवा समाप्तीस पात्र राहील.

१६. उपरोक्त उमेदवारास पदावर नेमणूक झाल्याच्या दिनांकापासून तीन वर्षाच्या आत विभागांतर्गत व्यवसायिक परीक्षा उत्तीर्ण होणे बंधनकारक राहील.

१७. उपरोक्त सर्व उमेदवारांना महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ (सेवेच्या सर्वसाधारण अटी व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अधिसूचना, नियम, शासन निर्णय, परिपत्रक व शुध्दीपत्रकातील सुधारणा/तरतुदी बंधनकारक राहतील.)

१८. उपरोक्त उमेदवाराने सहा महिन्याच्या आत वैद्यकीय दृष्ट्या सक्षम असल्याचे जिल्हा शासकीय रुग्णालयातील वैद्यकीय अधिकाऱ्यांकडून शासकीय सेवेत काम करण्यास पात्र असल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र नियुक्ती झालेल्या कार्यालयास सादर करणे बंधनकारक आहे.

१९. संबधित उमेदवाराची नेमणूक त्याचे पूर्वचारित्र्य व वर्तणूक (पोलीस चौकशी) यांच्या समाधानकारक तपासणी अहवालावर अवलंबून राहील.

२०. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१७०५१२१६१४२१२४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Bhimashankar Yallappa Manta

Digitally signed by Bhimashankar Yallappa Manta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries,Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873ce9a279d9561ff0cbf658e05b823c67c79dcac309fc4ebdac035d6aeec2a0, cn=Bhimashankar Yallappa Manta
Date: 2017.05.12 16:43:32 +05'30'

**( भि.य. मंता )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, प्रशासकीय इमारत, ३ रा मजला, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पू.), मुंबई-७१.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र मुंबई/नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/ निवासी लेखाधिकारी, मुंबई.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा, जालना, अमरावती, नाशिक.
५) उप सचिव (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) संबंधित कनिष्ठ अभियंता गट -ब (अराजपत्रित)यांना मुख्य विद्युत निरीक्षक यांचे मार्फत.
७) निवड नस्ती-ऊर्जा-५.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव (ऊर्जा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.